पोलीस आयुक्त व पोलीस अधीक्षक यांची कार्यालये आणि इतर कार्यालये यांच्या आस्थापनांवरील मानसेवी बालरोगतज्ञ यांची ४८ पदे आणि इतर वेगवेगळ्या संवर्गांतील २० पदे, अशा एकूण ६८ अस्थायी पदांना दिनांक ०१.१०.२०१८ पासून दिनांक २८.०२.२०१९ पर्यंत मुदतवाढ देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग

**शासन निर्णय क्रमांक पोरुग्णा-०९१८/प्र.क्र.३४९/पोल-७.**

मंत्रालय, दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.

दिनांक २४ सप्टेंबर, २०१८.

**वाचा** :-

१) शासन निर्णय, गृह विभाग, क्र. संकीर्ण-०३१६/प्र.क्र.१९८/पोल-७, दिनांक ३०.०९.२०१६.

२) शासन निर्णय, गृह विभाग, क्र. पोरुणा-१०१७/प्र.क्र.५३७/पोल-७, दिनांक ०५.०४.२०१८.

३) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/ आ.पु.क., दिनांक ०७.०९.२०१८.

४) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, यांच्या कार्यालयाचे पत्र क्र. पोमसं/ २६-ब/ ६१४३/ मुदतवाढ/ पोल-७/ १४/ २०१२, दिनांक २०.०८.२०१८.

**प्रस्तावना.-**

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई, यांच्या अधिपत्याखालील पोलीस आयुक्त व पोलीस अधीक्षक यांची कार्यालये आणि इतर कार्यालये यांच्या आस्थापनांवरील मानसेवी बालरोगतज्ञ यांची ४८ पदे आणि इतर वेगवेगळ्या संवर्गांतील २० पदे, अशी एकूण ६८ अस्थायी पदे *(शासन निर्णय, गृह विभाग, क्र.संकीर्ण.०३१६/प्र.क्र.१९८/पोल-७, दिनांक ३०.०९.२०१६, यामध्ये विनिर्दिष्ट केलेली)* यांची मुदत, शासन निर्णय, गृह विभाग, क्र. पोरुग्णा-१०१७/प्र.क्र.५३७/पोल-७, दिनांक ०५.०४.२०१८ द्वारे, दिनांक ०१.०३.२०१८ पासून ते दिनांक ३०.०९.२०१८ पर्यत वाढविण्यात आली होती. आता उक्त पदांना आणखी मुदतवाढ मिळणेबाबत पोलीस महासंचालक यांच्या कार्यालयाच्या संदर्भाधीन पत्राद्वारे विनंती करण्यात आली आहे.

२. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. पदनि-२०१६/ प्र.क्र.८/ १६/ आ.पु.क., दिनांक ०७.०९.२०१८, द्वारे "सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतिबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना, तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु ज्यांचा समावेश आकृतिबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दिनांक ०१.१०.२०१८ पासून दिनांक २८.०२.२०१९ पर्यत मुदतवाढ देण्याचे अधिकार देण्यात" आले आहेत. त्या अनुसार, शासनाने (गृह विभाग) आता पुढील निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय.-**

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई, यांच्या अधिपत्याखालील पोलीस आयुक्त व पोलीस अधीक्षक यांची कार्यालये आणि इतर कार्यालये यांच्या आस्थापनांवरील मानसेवी बालरोगतज्ञ यांची ४८ पदे आणि इतर वेगवेगळ्या संवर्गातील २० पदे, अशा एकूण ६८ अस्थायी पदांना दिनांक ०१.१०.२०१८ पासून दिनांक २८.०२.२०१९ पर्यंत मुदतवाढ देण्यास, पुढील अटींवर, याद्वारे, मान्यता देण्यात येत आहे:-

**अटी-**

१) सहा महिन्यांपेक्षा अधिक कालावधीसाठी रिक्त असलेल्या पदांना ही मुदतवाढ लागू राहणार नाही.
२) उक्त ६८ पदे ज्या अटी व शर्ती यांच्या आधीन मंजूर करण्यात आली आहे, त्या अटी व शर्ती यांचे काटेकोरपणे अनुपालन करण्यात यावे.
३) पदांचा आढावा घेऊन सुधारित आकृतिबंध शासनाच्या मान्यतेसाठी तात्काळ सादर करावा. यानंतर आकृतिबंध निश्चित करण्याकरिता उक्त पदांची मुदत वाढवून मिळणार नाही, याची नोंद घ्यावी.

२. उक्त ६८ पदांचे वेतन व भत्ते यांवरील खर्च हा सन २०१८-१९ या वित्तीय वर्षांत संबंधित लेखाशीर्षाखाली उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागवण्यात यावा.

३. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१८०९२६१७१२११८७२९ असा आहे. हा शासन निर्णय डीजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swapnil Gopal Borse

Digitally signed by Swapnil Gopal Borse
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=66835707253ff77ef0e333eb3ad582f9b876d443b2654088832e43dcad21c52a, cn=Swapnil Gopal Borse
Date: 2018.09.27 15:22:00 +05'30'

**(स्वप्नील गोपाल बोरसे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.

३. मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा/ विधानपरिषद, यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई.
४. मा. राज्यमंत्री (गृह-शहरे) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. राज्यमंत्री, गृह (ग्रामीण), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
८. संचालक, आरोग्य सेवा, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

**प्रत-**

१. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
३. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
४. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
५. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, मुंबई.
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, नागपूर.
७. कार्यासन अधिकारी, वित्त विभाग (आ.पु.क./वित्तीय सुधारणा-१), मंत्रालय, मुंबई.
८. कार्यासन अधिकारी, सार्वजनिक आरोग्य विभाग, नवीन मंत्रालय, नवीन गो.ते. रुग्णालय इमारत, मुंबई.
९. निवड फाईल (पोल-७).